**बेकायदेशीररित्या पशुंची वाहतूक करतांना पोलीसांमार्फत पकडण्यात आलेल्या पशुंची वैद्यकीय तपासणी करून आरोग्य दाखला देण्यासाठी आकारावयाच्या सेवाशुल्काबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन पूरकपत्र क्रमांक- व्हीएचडी-२०२१/प्र.क्र.१८८/पदुम-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- २१ जून, २०२३

वाचा :- १. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र.व्हिएचडी-२०२१/प्र.क्र.-१८८/पदुम-४, दि.२३.०५.२०२२.

२. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र.पविआ-१०२२/प्र.क्र.-१८८/पदुम-३, दि.०४.११.२०२२.

**प्रस्तावना :-**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाच्या वाचा क्र.१ येथील दि. २३.०५.२०२२ च्या शासन निर्णयान्वये पशुसंवर्धन विभागामार्फत देण्यात येणाऱ्या विविध सेवांचे सुधारित सेवाशुल्क निर्धारित करण्यात आले असून, मोठया जनावरांना आरोग्य दाखला देण्यासाठी रु. ५०/- सेवाशुल्क आकारावयाचे आहे.

२. बेकायदेशीररित्या पशुंची वाहतूक करताना पोलिसांमार्फत पकडण्यात आलेल्या पशुंची आरोग्य तपासणी करुन आरोग्य दाखला देण्यासाठी ज्या प्रकरणी वाचा क्र. २ येथील दि. ०४.११.२०२२ च्या शासन निर्णयातील २ (अ) (२) आणि २ (अ) (४) येथे नमुद तरतूदीची पूर्तता होत असेल, अशा प्रकरणी सेवाशुल्क न आकारण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन पूरकपत्र निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन पूरकपत्र :-**

३. वाचा क्र. २ येथील दि.०४.११.२०२२ च्या शासन निर्णयान्वये बेकादेशीररित्या पशुंची वाहतूक करताना पोलिसांमार्फत पकडण्यात आलेल्या पशुंच्या प्रकरणी पोलिस स्टेशनमध्ये गुन्हा दाखल झाल्यानंतर जप्त करण्यात आलेल्या पशुंची पशुवैद्यकीय अधिकारी यांचेकडून आरोग्य तपासणी करुन त्याच दिवशी पशुस्वास्थ दाखला द्यावयाचा आहे. तसेच, गुन्हा नोंद करुन जप्त केलेले पशु न्यायालयाच्या आदेशानुसार गोशाळा / पांजरापोळकडे विहीत प्रक्रियेचा अवंलब करुन पाठवावयाचे आहेत.

४. जप्त करण्यात आलेल्या तसेच एफआयआर नोंद झालेल्या पशुंच्या प्रकरणी उपरोक्त प्रमाणे कार्यवाही करण्यात आली असल्यास, जप्त केलेल्या पशुंची तपासणी करुन आरोग्य दाखला देण्यासाठी

कोणतेही सेवाशुल्क आकारण्यात येवू नये. जर एफआयआर / गुन्हा नोंद झाला नसल्यास सेवाशुल्कात सुट देण्यात येवू नये. फक्त गुन्हा नोंद झालेल्या प्रकरणी तसेच मा.न्यायालयाने पशु जप्त करण्याचे आदेश दिलेले असल्यास फक्त अशा प्रकरणी हे सेवाशुल्क माफ करण्यात यावे.

५. सदरचा शासन पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेताक २०२३०६२११२५५०३८१०१ असा आहे. सदर शासन पूरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=690002a7555559bb015f315b03adb3305c59fe381e4dcda1439d119129672733, pseudonym=B6831977DAFE9C462B1F5207DB8DC23334F34E62, serialNumber=5DBCE7AE3AC30F0E55C90CD14E851251037DC61F3291C80EA8638C44D41143AA, cn=DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
Date: 2023.06.21 12:56:11 +05'30'

**( डॉ. संजय वि. डोईजोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, जुने वळू संगोपन केंद्र, बडा हनूमान मंदिराजवळ, सिव्हिल लाईन्स, तेलंगखेडी, नागपूर.
४. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे.
५. पशुसंवर्धन सहआयुक्त, भारतरत्न अटलबिहारी वाजपेयी राज्यस्तरीय रोग अन्वेषण विभाग, पुणे.
६. पशुसंवर्धन सहआयुक्त, पशुजैव पदार्थ निर्मिती संस्था, औंध, पुणे.
७. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.
८. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. पशुसंवर्धन उपायुक्त, गुण नियंत्रण प्रयोगशाळा, गोरेगाव, मुंबई.
१०. विभागीय व्यवस्थापक, गोठीत रेत प्रयोगशाळा, पुणे, नागपूर व औरंगाबाद (हर्सुल).
११. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त
१२. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद.
१३. सर्व सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळा.
१४. सर्व सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुवैद्यकीय सर्वचिकित्सालय.
१५. सर्व सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालुका लघु पशुवैद्यकीय सर्वचिकित्सालय.
१६. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, पशुवधगृह, गोवंडी, देवनार.
१७. अवर सचिव (पदुम -३), कक्ष अधिकारी (पदुम १, २ व १६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती (पदुम-४).